लिपिक-टंकलेखक / सहायक सेवाप्रवेशोत्तर प्रशिक्षण परीक्षा आणि कक्ष अधिकारी विभागीय परीक्षेच्या अनुषंगाने मार्गदर्शक सूचना.

**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन परिपत्रक क्रमांकः संकीर्ण-२३१५/(प्र.क्र.१३)/का-१७**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई - ३२.

दिनांक : १७ एप्रिल, २०१५

वाचा

१) **अधिसूचना क्रमांकः इएक्सएम-२१७६/सतरा, दिनांक ६ जून, १९७७.**
२) **अधिसूचना क्रमांकः इएक्सएम-१६७६/सतरा, दिनांक ६ जून, १९७७.**
३) **अधिसूचना क्रमांकः इएक्सएम-१२७६/ सतरा, दिनांक ६ जून, १९७७.**
४) **अधिसूचना क्रमांक : एसआरव्ही-१०९०/११५/चौदा-ब, दिनांक ५ डिसेंबर, १९९१.**
५) **सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्रमांक : सेपप्र-२०१३/प्र.क्र.१९/१७, दिनांक ७ ऑक्टोबर, २०१३.**

**शासन परिपत्रक -**

मंत्रालयीन सेवेतील लिपिक, लिपिक-टंकलेखकांसाठी सेवा प्रवेशोत्तर प्रशिक्षण परीक्षा नियम, १९७७ विहित केले आहेत. तसेच सहायकांसाठी सेवाप्रवेशोत्तर प्रशिक्षण परीक्षा नियम, १९७७ विहित केले आहेत. त्यानुसार संबंधित कर्मचाऱ्यांनी नियमित नियुक्ती दिनांकापासून ४ वर्षाच्या कालावधीत ३ संधीत सेवाप्रवेशोत्तर प्रशिक्षण परीक्षा उत्तीर्ण होणे आवश्यक असते. अन्यथा परीक्षा उत्तीर्ण होईपर्यंत वेतनवाढ रोखण्यात येते. शिवाय सेवा ज्येष्ठता ही गमवावी लागते. तसेच मंत्रालयीन सेवेतील कक्ष अधिकारी पदावरील पदोन्नतीसाठी विभागीय परीक्षा नियम, १९७७ विहित केले आहेत. नामनिर्देशनाव्दारे मंत्रालयीन सेवेत नियुक्त केलेल्या कक्ष अधिकाऱ्यांकरिता विभागीय परीक्षा आणि प्रशिक्षण नियम, १९९१ अधिसूचित केले आहेत. सदरहू नियम, त्यामध्ये वेळोवेळी केलेल्या सुधारणांसह शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध आहेत.

२. वर नमूद सेवा प्रवेशोत्तर प्रशिक्षण परीक्षा आणि विभागीय परीक्षा विहित कालावधीत आणि संधीत उत्तीर्ण न झाल्यास होणाऱ्या परिणामांबाबत सविस्तर माहिती दिनांक ०७.१०.२०१३ च्या शासन परिपत्रकात दिली आहे.

३. लिपिक-टंकलेखक / सहायक सेवाप्रवेशोत्तर प्रशिक्षण परीक्षा आणि कक्ष अधिकारी पदोन्नतीसाठी विभागीय परीक्षा / नामनिर्देशनाव्दारे नियुक्त कक्ष अधिकाऱ्यांसाठी विभागीय परीक्षा यासंदर्भात “वारंवार विचारल्या जाणाऱ्या प्रश्नांबाबतचा ( F.A.Q. ) खुलासा” सामान्य प्रशासन विभागाच्या संकेतस्थळावर सुलभ संदर्भासाठी उपलब्ध करुन देण्यात आला आहे.

४. परीक्षा नियमांच्या अनुषंगाने संबंधित शासन निर्णय, परिपत्रके सुध्दा सामान्य प्रशासन विभागाच्या संकेतस्थळावर उपलब्ध आहेत.

५. महाराष्ट्र नागरी सेवा ( सेवेच्या सर्वसाधारण शर्ती ) नियम, १९८१ मधील नियम ३८ च्या तरतूदीनुसार संबंधित शासकीय कर्मचाऱ्याच्या सर्व महत्त्वाच्या गोष्टींची नोंद सेवापुस्तकामध्ये घेणे आवश्यक आहे. तसेच वर नमूद सेवाप्रवेशोत्तर प्रशिक्षण परीक्षा आणि विभागीय परीक्षा नियमांतील तरतूदीनुसार संबंधित कर्मचारी / अधिकारी यांनी परीक्षा उत्तीर्ण केल्याबाबतच्या सर्व नोंदी त्यांच्या सेवापुस्तकात घेणे आवश्यक आहे. शिवाय सेवापुस्तकातील नोंदी अद्ययावत नसल्यास निवृत्तीवेतन प्रकरण मंजूर होण्यास विलंब होतो. या बाबी विचारात घेवून सर्व मंत्रालयीन विभागांना पुढीलप्रमाणे सूचना देण्यात येत आहेत :-

(१) मंत्रालयीन विभागांनी ( आस्थापना ) आपल्या नियंत्रणाखालील लिपिक, लिपिक-टंकलेखक / सहायक / कक्ष अधिकारी यांच्या सेवाप्रवेशोत्तर प्रशिक्षण परीक्षा / विभागीय परीक्षेसंदर्भातील सर्व नोंदी सेवापुस्तकात अद्ययावत ठेवणे आवश्यक आहे.

( २ ) सर्व संबंधित कर्मचाऱ्यांनी नियमित नियुक्ती दिनांकापासून विहित संधी आणि कालावधीत परीक्षा उत्तीर्ण होणे आवश्यक असते. त्यामुळे संबंधितांच्या नियमित नियुक्ती दिनांकानंतर परीक्षेसंदर्भातील प्रत्यके वर्षाचा तपशिल ( उदा. परीक्षेचे नाव / वर्ष / संधी क्रमांक / निकाल/ काही विषयात सूट मिळाली असल्यास त्याचा तपशिल / परीक्षेला बसण्यासाठी विहित मुदतीत अर्ज भरला नाही / परीक्षेला अनुपस्थित होते इत्यादी नोंदी संबंधितांच्या सेवापुस्तकात न चुकता घेण्यात याव्यात.

( ३ ) विहित संधीत आणि कालावधीत परीक्षा उत्तीर्ण न झालेल्या कर्मचाऱ्यांची संबंधित नियमातील तरतूदीनुसार वेतनवाढ रोखणे, परीक्षा उत्तीर्ण झाल्यानंतर अथवा परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून सूट मिळेपर्यंत रोखून ठेवलेली वेतनवाढ मोकळी ( Release ) करणे इत्यादीबाबत तातडीने कार्यवाही करण्यात यावी. त्याबाबतच्या नोंदी सुध्दा संबंधितांच्या सेवापुस्तकात घेण्यात याव्यात.

( ४ ) बऱ्याचवेळा अधिकारी / कर्मचारी विभागीय परीक्षा देताना एका विभागात असतो व निकालाच्या वेळी दूसऱ्या विभागात कार्यरत असतो त्यामुळे नवीन कार्यालयाच्या सदर बाब निदर्शनास आली नाही तर नोंदी घेण्याचे राहून गेल्याचे आढळते. यासाठी वरीलप्रमाणे सर्व नोंदी आपल्या सेवापुस्तकात वेळोवेळी घेतल्या जात आहेत याबाबत संबंधित अधिकारी / कर्मचारी यांनीही संबंधित विभागास कळवावे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१५०४१७१४५७३४२६०७ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Surve Rajendra K

Digitally signed by Surve Rajendra K
DN: CN = Surve Rajendra K, C = IN, S = Maharashtra, O = Mantralaya Canteen, OU = Mantralaya Canteen
Date: 2015.04.17 15:11:40 +05'30'

**( राजेंद्र सुर्वे )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग.
३. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने)
४. सर्व मंत्रालयीन विभाग ( आस्थापना ).
५. सामान्य प्रशासन विभाग, कार्या १४-ब.
६. निवडनस्ती.